**अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या शासन स्थापित स्वायत्त संस्थेच्या CSAT २ प्रकल्पासाठी विशेष निधी मंजूर करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बांनिधी-१२१६/(प्र.क्र.१४०/२०१६)/तांशि-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १५ जून, २०१७.

वाचा-
१) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र. सीटीसी -१०९४/५७८०१/(६३३८)/तांशि-१, दि.२८ फेब्रुवारी, १९९६.
२) संचालक, अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे यांचे पत्र क्र.COEP/DTE/CSAT/DIR OFF/२०१६ /३०४८, दि.३० जून, २०१६
३) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र.९ (२)/वि.निधी/२०१६/२३३, दि.१२ जुलै, २०१६.

प्रस्तावना-

शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे ह्या संस्थेची स्थापना सन १८५४ मध्ये करण्यात आली. या संस्थेस TEQIP या जागतिक बँक प्रकल्पातंर्गत स्वायत्ता प्रदान करण्यात आलेली आहे. त्यामुळे ही संस्था अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या नावाने ओळखली जाते. या संस्थेच्या विद्यार्थ्यांनी "स्वयंम्" हा उपग्रह यशस्वीपणे तयार करुन आंतरिक्षात सोडला आहे. या महाविद्यालयातील विद्यार्थ्यांचा शैक्षणीक दर्जा सुधारण्यासाठी संस्थेने CSAT २ प्रोजेक्ट हाती घेतलेला आहे. या संस्थेतील CSAT २ प्रकल्पासाठी आवश्यक उपकरणे खरेदी करण्याकरिता रु.८३.६१ लक्ष ची यंत्रसामुग्री खरेदी करण्याचे प्रस्तावीत करण्यात आलेले आहे. त्यापैकी रु.२०.६० लक्ष इतकी रक्कम इस्रो या संस्थेकडून प्राप्त झालेली आहे. अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या संस्थेस CSAT २ प्रकल्पासाठी आर्थिक मदतीची आवश्यकता आहे. सदर प्रकल्पाच्या उद्घाटनाच्या वेळी मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांनी सदर प्रकल्पासाठी रु.५०.०० लक्ष इतका निधी देण्याचे जाहीर केले होते. त्यास अनुसरुन संदर्भ क्र.३ येथील दि.१२ जुलै, २०१६ च्या पत्राव्दारे तंत्रशिक्षण संचालकांनी शासनास प्रस्ताव सादर केला होता. त्या अनुषंगाने अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या संस्थेस CSAT २ या प्रकल्पासाठी विशेष निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या संस्थेच्या CSAT २ या प्रकल्पासाठी रु.५०.०० लक्ष (अक्षरी रुपये पन्नास लक्ष फक्त) इतका एकरकमी विशेष निधी मंजूर करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. संचालक, तंत्रशिक्षण यांनी तंत्रशिक्षण संचालनालयाच्या स्वीय प्रपंजी लेख्यातून (PLA) रु.५०.०० लक्ष इतका निधी आहंरित करुन अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या संस्थेकडे सूपुर्द करावा.

३. अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या संस्थेने या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र १ वर्षाच्या कालावधीमध्ये संचालक, तंत्रशिक्षण यांच्याकडे सादर करावे.

४. या प्रकल्पासाठी या पेक्षा जादा निधी शासनाकडून उपलब्ध करुन दिला जाणार नाही. या प्रकल्पासाठी उर्वरित निधीची तरतूद संस्थेने स्वत:च्या उत्पन्नातून करावयाची आहे.

५. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने आणि त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५०९/१७/व्यय-४, दि.१६ मे, २०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१६१६१९३५१६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2017.06.16 16:17:09 +05'30'

**( संजय औ. धारुरकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सर्व सह-संचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, (संचालक, तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत
३. संचालक, अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई
५. अधिदान व लेखाधिकारी, बृन्हमुंबई.
६. कार्यासन तांशि-२, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती.